राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत महाराष्ट्र संवर्गातील अभासे अधिकारी यांना स्तर-१ मध्ये जमा असलेल्या अंशदानाची रक्कम गुंतवणूकीचा विकल्प निवडण्याची मुभा देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे-२५२३/प्र.क्र.२२/२०२३/९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६.०४.२०२३

**वाचा** : १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.भाप्रसे २५०६/प्र.क्र.३६०/०६/९, दि.१५.०२.२०१३

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.भाप्रसे २५०६/प्र.क्र.३६०/०६/९, दि.२४.०३.२०१४

३. केंद्र शासनाचे वित्तीय सेवा विभाग, वित्त मंत्रालय यांची अधिसूचना राजपत्र क्र.फा.सं.१/३/ २०१६-पीआर, दि.३१/०१/२०१९.

४. निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांचे परिपत्रक क्र.PFRDA/ २०१९/१२/REG-PF/१, दि.०८/०५/२०१९.

५. निवृत्तिवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PRFDA)यांचे परिपत्रक क्र.PFRDA/२०२०/४५/REG-PF/७, दि.०५/१०/२०२०.

**प्रस्तावना** :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.१५.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये, दि.०१.०१.२००४ रोजी वा त्यानंतर शासन सेवेमध्ये नियुक्त झालेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांसाठी राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना कार्यान्वित करण्याकरिताची कार्यपद्धती अवलंबिण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. केंद्र शासनाने राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीकरिता निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (Pension Fund Regulatory and Development Authority) ची स्थापना केली आहे. राष्ट्रीय निवृत्तीवेतन अंतर्गत स्तर-१ मध्ये जमा रक्कमेच्या अनुषंगाने, निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची निवड व निधी वाटपाचे प्रमाण निश्चित करण्याचे अधिकार वैयक्तिक वर्गणीदारास देण्याची योजना पूर्णपणे कार्यान्वित होईपर्यंत निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकामध्ये निधी वाटपाचे प्रमाण हे केंद्र शासनाकडून केंद्र शासकीय कर्मचा-यांसाठी दरवर्षी/वेळोवेळी निश्चित होणा-या प्रमाणाएवढेच ठेवण्याचा निर्णय दि.१५.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

२. सद्य:स्थितीमध्ये राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांच्या वेतनातून कपात होणाऱ्या मासिक अंशदानाची रक्कम गुंतवणूक करण्यासाठी निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांच्या निर्देशानुसार निवृत्तीवेतन निधीची रक्कम गुंतवणूकीसाठी सार्वजनिक उपक्रम क्षेत्रातील निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकांची (Pension Fund Manager-PFM) निवड केली आहे.

३. केंद्र शासनाने व निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांनी संदर्भ क्र.३ व ४ अन्वये राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या केंद्रीय कर्मचाऱ्यांना, त्यांच्या वेतनातून कपात होणाऱ्या मासिक अंशदानाची रक्कम गुंतवणूक करण्याकरिता निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक (PFM) व

गुंतवणूक करावयाच्या योजना (Scheme Preference - निवडीचे विकल्प) निवडण्याची मुभा दिली आहे. तसेच, संदर्भ क्र.५ अन्वये केंद्रीय कर्मचाऱ्यांचा राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजने अंतर्गतचा संचित निधी (Accumulated Corpus) त्यांच्या निवड केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूक केलेल्या योजनामध्ये वर्ग करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

४. तद्नुषंगाने राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना त्यांच्या प्रान (PRAN) खात्यात जमा असलेली मासिक अंशदानाची रक्कम संचित निधीसह गुंतवणूक करण्यासाठी निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प निवडण्याची मुभा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. **निवृत्तीवेतन निधी निवडीचा विकल्प** (Choice of Pension Fund):- राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना यापुढे कोणत्याही एका निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची निवड करण्याचा विकल्प राहील. यामध्ये सार्वजनिक क्षेत्रातील निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकासह खाजगी क्षेत्रातील निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाच्या निवडीचा विकल्प उपलब्ध राहील. सभासद (Subscriber) वर्षातून एकदा आपला विकल्प बदलू शकतात. तथापि, सार्वजनिक क्षेत्रातील निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकांची सध्याची योजना विद्यमान व नवीन सभासदांसाठी स्वयंचलितपणे (Default) उपलब्ध राहील.

२. **गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प** (Choice of Investment Pattern):- महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांकरिता गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प खालील प्रमाणे राहतील :-

**२.१. डिफॉल्ट योजना** (Default Scheme):- राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचे सभासद असलेल्या व नव्याने सभासद होणाऱ्या अधिकाऱ्यांकरीता सध्या अस्तित्वात असलेली सार्वजनिक उपक्रम क्षेत्रातील निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकांमधील गुंतवणूकीची योजना स्वयंचलितरित्या (Default) उपलब्ध राहील.

**२.२. स्कीम -जी** (Scheme - G):- अधिका-यांना तुलनेने कमी जोखमीत व निश्चित परतावा हवा असल्यास त्यांना त्यांचा १००% निधी सरकारी रोख्यांमध्ये गुंतवणूक करण्याचा योजना-जी अंतर्गत विकल्प राहील.

**२.३. ऑटो चॉईस लाईफ सायकल निधी** (Auto Choice Life Cycle Funds):- अधिका-यांना अधिकचा परतावा हवा असल्यास त्यांना तुलनेने अति जोखमीच्या खालील जीवनचक्र निधी आधारीत योजना निवडण्याचा विकल्प राहील.

**२.३.१ कन्झरव्हेटीव्ह लाईफ सायकल निधी** (Conservative life cycle Funds)- कमाल २५% मर्यादेत इक्विटीमध्ये गुंतवणूक करता येईल § LC-२५ Scheme.

**ज्या अधिका-याने कन्झरव्हेटिव्ह लाईफ सायकल फंड** (Conservative life cycle Funds) **या विकल्पाची निवड केली असेल त्यांना कमाल २५%** मर्यादेत इक्विटीमध्ये गुंतवणूक करता येईल व उर्वरित ७५% रक्कमेची गुंतवणूक खाजगी रोख्यामध्ये (Corporate Debt) कमाल ४५% व शासकीय रोख्यांमध्ये (Government Debt) किमान ३०% च्या मर्यादेत वयोमानानुसार गुंतवणूक होईल. वयाप्रमाणे गुंतवणूकीच्या प्रमाणाबाबतचे तक्ता जोडपत्र-२ पहावे.

**२.३.२ मॉडरेट लाईफ सायकल निधी** (Moderate life cycle Funds)- कमाल ५०% मर्यादेत इक्विटीमध्ये गुंतवणूक करता येईल § LC-५० Scheme.

**ज्या अधिका-या मॉडरेट लाईफ सायकल निधी** (Moderate life cycle Funds) **या विकल्पाची निवड केली असेल त्यांना कमाल ५०%** मर्यादेत इक्विटीमध्ये गुंतवणुक करता येईल व उर्वरित ५०% रक्कमेची गुंतवणूक खाजगी रोख्यामध्ये (Corporate

Debt) कमाल ३०% व शासकीय रोख्यांमध्ये (Government Debt) किमान २०% च्या मर्यादेत वयोमानानुसार गुंतवणूक होईल. वयाप्रमाणे गुंतवणुकीच्या प्रमाणाबाबतचा तक्ता जोडपत्र-३ पहावा.

३. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना एकदा निवडलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक अंतर्गत वरील नमूद गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प (Choice of Investment Pattern) निवडण्याची वर्षातून दोन वेळा मुभा राहील.

४. जर सभासदाने (Subscriber) कोणत्याही गुंतवणूक निधी व्यवस्थापकाची (PFM) अथवा गुंतवणूकीच्या पध्दतीचे (Choice of Investment Pattern) विकल्पाची निवड केली नाही तर, सध्या अस्तित्वात असलेली सार्वजनिक उपक्रम क्षेत्रातील निवृत्तीवेतन व्यवस्थापकांमधील निधी गुंतवणूकीची स्वयंचलित योजना (Default Scheme) लागू राहील.

५. निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूकीच्या पध्दतीचा विकल्प निवडण्याचा अधिकार राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अधिका-यांना देण्यात येत असल्याने, त्या अंतर्गत येणारी संपूर्ण जबाबदारीही त्यांचीच राहील.

६. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अधिका-यांनी निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूकीच्या पध्दतीचा विकल्प निवडण्याकरीता त्यांचा मोबाईल क्रमांक (Mobile Number) हा केंद्रीय देखभाल अभिकरण (CRA) म्हणजेच मे. एन. एस. डी. एल. प्रणालीमध्ये त्यांच्या PRAN क्रमांकाशी संलग्न असणे बंधनकारक आहे.

७. ज्यावेळी सभासद निवृत्तिवेतन निधी व्यवस्थापक अथवा गुंतवणूक योजनेची निवड करेल त्यावेळी सभासदास Per Transaction सध्या रु.३.७५ इतके सेवाशुल्क तसेच यामध्ये वेळोवेळी होणाऱ्या बदलाप्रमाणे सेवाशुल्क लागू राहील. सदर सेवाशुल्क सभासदांच्या अंशदानाच्या रकमेतून आपोआप वसूल करण्यात येईल.

८. **लिगसी कॉर्पसच्या निवडीची अंमलबजावणी (Implementation of choices to legacy corpus):** निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण- PFRDA (Pension Fund Regulatory and Development Authority) यांच्याकडील संदर्भ क्र.५ अन्वये राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना त्यांच्या नियमित अंशदानाच्या रकमेसह लिगसी कॉर्पस/ संचित निधी (Accumulated Corpus) मधील रक्कम त्यांनी निवड केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व त्या अंतर्गत गुंतवणूकीच्या योजनेमध्ये गुंतवणूक करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

९. **निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व त्या अंतर्गत गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प निवडण्याचे पर्याय:**

**९.१. नमुना अर्जाव्दारे :-**

**९.१.१.** सभासदाने (Subscriber) केंद्रीय देखभाल अभिकरण (CRA) यांची वेबसाईट (www.cra.nsdl.co.in) वरुन नमुना GOS-S३ (निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व त्या अंतर्गत गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प बदलाचा विहीत नमुना/अर्ज) डाउनलोड करावा आणि तो नमुना रितसर भरुन आहरण व संवितरण अधिकारी यांचेमार्फत संबंधित कोषागार अधिकारी यांचे कार्यालयात जमा करावा.

**९.१.२** सभासदाने (Subscriber) आहरण व संवितरण अधिकरण यांच्याकडे सादर केलेला अर्ज त्यांनी कोषागार कार्यालयात जमा केल्यानंतर संबंधित कोषागार कार्यालयाने केंद्रीय देखभाल अभिकरण (CRA) म्हणजेच मे. एन. एस. डी. एल. प्रणालीमध्ये योजना प्राधान्य बदल विनंती नोंदणी करणे आवश्यक आहे. त्यानंतर कोषागार कार्यालयांकडून अशा प्रकारे केलेली नोंदणी मे. एन. एस. डी. एल. प्रणालीमध्ये प्रमाणित करुन मंजूरी देणे आवश्यक आहे. कोषागार कार्यालय स्तरावर सदर कार्यवाही सभासदाचा अर्ज प्राप्त झाल्यानंतर कार्यालयीन कामकाजाच्या पाच (५)

दिवसांत पूर्ण करणे बंधनकारक राहील. कोषागार कार्यालय स्तरावर कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व त्या अंतर्गत गुंतवणूकीच्या पध्दतीचे विकल्प बदलाची प्रक्रिया मे. एन. एस. डी. एल. यांचेकडून T+३ दिवसात पूर्ण होईल.

**९.२ CRA प्रणालीवर ऑनलाईन लॉग इन करुन:-**

**९.२.१** राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांनी त्यांच्या PRAN खाती स्तर-१ मध्ये जमा असलेल्या अंशदानाच्या रकमेकरिताचा गुंतवणूकीचा विकल्प निवडण्याकरिता, प्रथम सभासदाने (Subscriber) ऑनलाईन पध्दतीने केंद्रीय देखभाल अभिकरण (CRA) म्हणजेच मे. एन. एस. डी. एल. प्रणालीवर (https://cra.nsdl.com) लॉग इन करुन योजना प्राधान्य बदलाची विनंती नोंदणी करावी. तद्नंतर, प्रणालीवरील भरलेल्या आवश्यक त्या सर्व माहितीची पडताळणी करुन Submission केल्यानंतर सभासदाच्या मोबाईल क्रमांकावर प्राप्त झालेला ओटीपी (OTP) प्रणालीत नोंदवून मे. एन. एस. डी. एल. यांचे प्रणालीमध्ये सभासदाने स्वत: मंजूरी देणे आवश्यक आहे. याकरिताची विहीत कार्यपध्दती सोबतच्या जोडपत्र-१ मध्ये सविस्तररित्या नमूद करण्यात आली आहे.

**९.२.२** वरील नमूद प्रमाणे सभासदाने (Subscriber) कार्यवाही केल्यानंतर मे. एन. एस. डी. एल. यांचेकडून T+३ दिवसात निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूकीच्या पध्दतीचा विकल्प बदलाची प्रक्रिया पूर्ण होईल.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०६१५३५४०२२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL GANGARAM GANGARKAR

Digitally signed by SUNIL GANGARAM GANGARKAR
DN: CN = SUNIL GANGARAM GANGARKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.04.06 15:42:16 +05'30'

**(सु.गं.गांगरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
११. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१२. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
१३. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. कार्यकारी संचालक, निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण, बी-१४/ए, छत्रपती शिवाजी भवन, कुतुब संस्थागत क्षेत्र, कटवारिया सराय, नवी दिल्ली § ११० ०१६
२०. कार्यकारी उपाध्यक्ष, मे.एन.एस.डी.एल., e-Governance Infrastructure Limited, १ ला मजला, टाईम्स टॉवर, कमला मिल आवार, सेनापती बापट मार्ग, लोअर परेल, मुंबई § ४०० ०१३
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२३. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
२४. सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
२५. संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
२६. सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
२७. सहाय्यक संचालक (लेखा), कार्यासन ९-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२८. निवड नस्ती

**(सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. भाप्रसे-२५२३/प्र.क्र.२२/२०२३/९, दिनांक ०६.०४.२०२३ च्या परिच्छेद ९ मध्ये निर्दिष्ट केलेले)**

**जोडपत्र-१**

**राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या अधिका-यांनी मे. एन. एस. डी. एल. यांचे CRA प्रणालीवर ऑनलाईन पध्दतीने निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणुकीच्या पदध्तीचे विकल्प निवड करताना अनुसरावयाची कार्यपध्दती.**

i. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेले अधिकारी (Subscriber) सर्वप्रथम https://cra.nsdl.com या संकेतस्थळावर जाऊन त्यांचा Login Id व Password चा वापर करुन Login करतील.

(Subscriber to login to >> https://cra.nsdl.com)



ii. Subscriber ने Login केल्यानंतर त्यांना Transact Online या बटनावर (Tab) Click केल्यानंतर त्या ठिकाणी विविध पर्याय उपलब्ध होतील. त्यामधील Change Scheme Preference हा पर्याय निवडावा.

(Click on – Transact Online>Change Scheme Preference)



iii. Change Scheme Preference हा पर्याय निवडल्यानंतर त्यामधील Tier Type येथे Tier-I (स्तर-१) हा पर्याय निवडावा.

(Select Tier-I as the case may be and click Submit)



iv. Tier-I (स्तर-१) हा पर्याय निवडल्यानंतर समोर दिसत असलेल्या माहितीचे काळजीपूर्वक अवलोकन व खात्री करुन Proceed बटनावर Click करावे.

(Read the pop up notes carefully and click to Proceed)



v. Proceed बटनावर Click केल्यानंतर सद्यस्थितीत गुंतवणूक करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणुकीची योजना याबाबतची माहिती दिसेल त्याचे अवलोकन करावे.

(View the details displayed)



vi. Proceed बटनावर Click केल्यानंतर सद्यस्थितीत गुंतवणूक करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापक व गुंतवणूकीची योजना याबाबतची माहितीचे अवलोकन केल्यानंतर PFM व Scheme Preference Change या बटनांवर Tick (√) केलेबाबतची खात्री करावी.

(Check if PFM & Scheme Preference Change are tick marked (√))



vii. PFM व Scheme Preference Change या बटनांवर Tick (√) केलेबाबतची खात्री केल्यानंतर Submit या बटनावर Click करावे.

(Click Submit)



viii. PFM व Scheme Preference Change या बटनांवर Tick (√) करुन Submit केल्यानंतर निवड करावयाच्या गुंतवणूक योजनेचे प्रकार समोर दिसतील. त्यामधील गुंतवणूक योजनेचे प्रकार पसंतीनुसार निवडावयाचा आहे.

(Select Scheme Preference Type)



ix. गुंतवणूक योजनेचे प्रकार पसंतीनुरुप निवडल्यानंतर Add या बटनावर Click करावे आणि उपलब्ध होणाऱ्या पर्यायामधून निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) पसंतीनुसार निवड करावी.

(Click on Add and then select Pension Fund Manager)

x. निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) पसंतीनुरुप निवड केल्यानंतर Submit या बटनावर Click करावे.

(Click Submit)

xi. निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) निवड करुन Submit केल्यानंतर निवड केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) व गुंतवणूक योजनेचे प्रकार (Scheme Preference) समोर दिसतील.

(View the details displayed)

xii. निवड केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) व गुंतवणूक योजनेचे प्रकार (Scheme Preference) याची खात्री केल्यानंतर Send OTP या बटनावर Click करावे.

(Click Send OTP)

xiii. Send OTP या बटनावर Click केल्यानंतर संबंधित Subscriber च्या प्रान क्रमांकाशी (PRAN) (मे. एन. एस. डी. एल यांच्या प्रणालीमध्ये) जोडणी केलेल्या (Attach) मोबाईल (Mobile Number) क्रमांकावर किंवा ई-मेल आयडीवर (e-mail Address) ओटीपी (OTP) प्राप्त होईल व सदर प्राप्त झालेला ओटीपी (OTP) उपलब्ध असलेल्या आवश्यक त्या रकान्यामध्ये नमूद करुन Submit OTP या बटनावर Click करावे.

(Enter the OTP received and click Submit OTP)

xiv. Submit OTP या बटनावर Click केलेनंतर प्राप्त होणारा Acknowledgement Number जतन करावा. तसेच संगणकावरील उपलब्ध Screen आपल्या भविष्यातील सोयीकरीता Screen Capture करुन ठेवावी. नवीन निवड केलेल्या निवृत्तीवेतन निधी व्यवस्थापकाची (Pension Fund Manager) व गुंतवणूक योजनेचे प्रकार (Scheme Preference) हे वरील सर्व प्रक्रिया यशस्वीरित्या पूर्ण झाल्यानंतर T+३ days या कालावधीत कार्यान्वित होतील.

(Note down the Acknowledgement number generated by the system for your records. Save the screen capture of this page for future use if required. New PFM/Scheme will take effect at T+३ once this process is completed)

------

## जोडपत्र - २

**LC-25** : **Conservative Life Cycle Fund** : This Life cycle fund provides a cap of 25% of the total assets for Equity investment. The exposure in Equity Investments starts with 25% till 35 years of age and gradually reduces as per the age of the Subscriber.

| Age | Asset Class E | Asset Class C | Asset Class G |
|---|---|---|---|
| Up to ३५ years | २५ | ४५ | ३० |
| ३६ years | २४ | ४३ | ३३ |
| ३७ years | २३ | ४१ | ३६ |
| ३८ years | २२ | ३९ | ३९ |
| ३९ years | २१ | ३७ | ४२ |
| ४० years | २० | ३५ | ४५ |
| ४१ years | १९ | ३३ | ४८ |
| ४२ years | १८ | ३१ | ५१ |
| ४३ years | १७ | २९ | ५४ |
| ४४ years | १६ | २७ | ५७ |
| ४५ years | १५ | २५ | ६० |
| ४६ years | १४ | २३ | ६३ |
| ४७ years | १३ | २१ | ६६ |
| ४८ years | १२ | १९ | ६९ |
| ४९ years | ११ | १७ | ७२ |
| ५० years | १० | १५ | ७५ |
| ५१ years | ९ | १३ | ७८ |
| ५२ years | ८ | ११ | ८१ |
| ५३ years | ७ | ९ | ८४ |
| ५४ years | ६ | ७ | ८७ |
| ५५ years & above | ५ | ५ | ९० |

## जोडपत्र – ३

**LC-50 : Moderate Life Cycle Fund**: This Life cycle fund provides a cap of 50% of the total assets for Equity investment. The exposure in Equity Investments starts with 50% till 35 years of age and gradually reduces as per the age of the Subscriber.

| Age | Asset Class E | Asset Class C | Asset Class G |
|---|---|---|---|
| Up to ३५ years | ५० | ३० | २० |
| ३६ years | ४८ | २९ | २३ |
| ३७ years | ४६ | २८ | २६ |
| ३८ years | ४४ | २७ | २९ |
| ३९ years | ४२ | २६ | ३२ |
| ४० years | ४० | २५ | ३५ |
| ४१ years | ३८ | २४ | ३८ |
| ४२ years | ३६ | २३ | ४१ |
| ४३ years | ३४ | २२ | ४४ |
| ४४ years | ३२ | २१ | ४७ |
| ४५ years | ३० | २० | ५० |
| ४६ years | २८ | १९ | ५३ |
| ४७ years | २६ | १८ | ५६ |
| ४८ years | २४ | १७ | ५९ |
| ४९ years | २२ | १६ | ६२ |
| ५० years | २० | १५ | ६५ |
| ५१ years | १८ | १४ | ६८ |
| ५२ years | १६ | १३ | ७१ |
| ५३ years | १४ | १२ | ७४ |
| ५४ years | १२ | ११ | ७७ |
| ५५ years & above | १० | १० | ८० |